**स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) अंतर्गत १९ नोव्हेंबर या जागतिक शौचालय दिना निमित्ताने दिनांक १७ नोव्हेंबर, २०२० ते दिनांक २७ नोव्हेंबर,२०२० या कालावधीत विशेष अभियान राबविणे बाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :-स्वभामि २०२०/प्र.क्र.२१८/पापु १६**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :-११ नोव्हेंबर, २०२०.

**संदर्भ:** १) स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा-२, बाबत केंद्र शासनाच्या माहे जुलै २०२० च्या मार्गदर्शक सूचना.
२) शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्रमांक : स्वभामि २०२०/प्र. क्र.१९० / पापु १६ दिनांक २ नोव्हेंबर २०२०

**प्रस्तावना:-**

राज्यातील हागणदारीमुक्त झालेल्या ग्रामपंचायतीमध्ये स्वच्छतेचे सातत्य कायम राहण्यासाठी तसेच सांडपाणी व घनकचरा व्यवस्थापन, सार्वजनिक शौचालयांची उपलब्धता या अनुषंगाने राज्यात **स्वच्छ भारत मिशन (ग्रामीण) टप्पा २** ची सुरुवात झाली आहे. केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनेनुसार सदर अभियानाची अंमलबजावणी करण्यात येत आहे. याचाच एक भाग म्हणून दिनांक १९ नोव्हेंबर, २०२० या जागतिक शौचालय दिनाचे औचित्य साधून सार्वजनिक/वैयक्तिक/शाळा/अंगणवाडी शौचालय संदर्भात विशेष अभियान राबविण्याची आवश्यकता आहे.

**शासन परिपत्रक:-**

त्यानुषंगाने राज्यात उपलब्ध असणाऱ्या सामुदायिक/सार्वजनिक शौचालय सुविधांचा शाश्वत वापर, योग्य देखभाल, दुरुस्ती आणि अनुषंगिक सुविधांची उपलब्धता तसेच वैयक्तिक शौचालयांची उपलब्धता व निधी वाटप, शाळा व अंगणवाडी शौचालयांची देखभाल दुरूस्ती यावर विशेष भर देऊन शौचालयांचे महत्व अधोरेखित करणारे आणि उपलब्ध शौचालयांचा शाश्वत वापर होण्याच्या दृष्टीने पूरक ठरणारे विविध उपक्रम दिनांक १७ नोव्हेंबर,२०२० ते दिनांक २७ नोव्हेंबर, २०२० या कालावधीत आयोजित करण्याबाबत पुढील प्रमाणे सूचना निर्गमित करण्यात येत आहेत:-

**अ) अभियानाचे नियोजन:-**

जागतिक शौचालय दिन (दिनांक १९ नोव्हेंबर, २०२०) साजरा करण्याच्या दृष्टीने जिल्हा पाणी व स्वच्छता मिशन कक्षामार्फत खालील प्रमाणे नियोजन करण्यात यावे:-

- जागतिक शौचालय दिनानिमित्त विशेष अभियान राबविण्याच्या दृष्टीने नमूद केलेल्या उपक्रमांची माहिती देण्यासाठी दिनांक १३ नोव्हेंबर, २०२० रोजी Zoom VC द्वारे सर्व ग्रामपंचायतींसोबत बैठकीचे आयोजन करावे.

- सदर VC च्या वेळी त्यांच्या नियंत्रणाखालील गावातील शाळा, अंगणवाडी, सार्वजनिक शौचालये, ग्रामपंचायत कार्यालयातील शौचालये यांची देखभाल दुरूस्ती, नवीन कामांचा शुभारंभ, पूर्ण झालेल्या शौचालयांना निधी वितरण या सर्वांबाबत सविस्तर माहिती द्यावी.
- अभियानाला सुरुवात करण्यापूर्वी जिल्ह्यातील सर्व गावातील सार्वजनिक शौचालयांची माहिती एकत्रित करावी. अभियान दरम्यान दुरुस्त करावयाच्या सार्वजनिक शौचालयाची निवड करावी.
- सार्वजनिक/वैयक्तिक शौचालय अंतर्गत नव्याने बांधकाम करावयाची शौचालये, बांधकामे पूर्ण झाली आहेत तथापि निधी देणे शिल्लक असणारी शौचालये, शौचालये वापरात आहेत तथापि देखभाल दुरूस्ती करणे आवश्यक असणारी शौचालये, नादुरूस्त शौचालये व त्यामागील कारणे आणि दुरूस्तीकरिता आवश्यक उपाययोजना यांची यादी तयार करावी.गावात वैयक्तिक शौचालय बांधकाम पूर्ण करणे शिल्लक असलेल्या कुटुंबांची माहिती, शौचालय पूर्ण झाले परंतु अनुदान देणे शिल्लक असणारी शौचालये यांची यादी तयार करावी.
- निवड केलेल्या उपक्रमांसाठी ग्रामपंचायतवार सार्वजनिक, शाळा, अंगणवाडी आणि ग्रामपंचायत कार्यालय इत्यादी ठिकाणी उपलब्ध शौचालय सुविधांची सदयस्थिती लक्षात घेवून उपक्रमांची अंमलबजावणी करावी.
- जागतिक शौचालय दिनाच्या नियोजनाबाबतची माहिती विविध प्रसार माध्यमातून जास्तीत जास्त लोकांपर्यंत पोहोचवावी .
- जागतिक शौचालय दिन २०२० च्या निमित्ताने गावपातळीवर आयोजित उपक्रमांची अंमलबजावणी योग्य पद्धतीने होण्यासाठी तालुका आणि ग्रामपंचायतवार जबाबदारीचे वाटप करावे.
- संबंधित विविध शासकीय विभाग (शिक्षण /महिला बाल विकास/आरोग्य /ग्राम विकास /जनसंपर्क विभाग), व्हीएसटीएफ, यांच्या सक्रीय सहभागासाठी त्यांच्याशी संपर्क करून त्यांच्याकडे जागतिक शौचालय दिनाचे जिल्हा नियोजन पाठवावे तसेच Zoom VC द्वारे उपक्रमाची माहिती द्यावी.
- दिनांक १७ नोव्हेंबर, २०२० ते २७ नोव्हेंबर, २०२० दरम्यान शक्यतेनुसार ग्रामपंचायतींना भेटी देवून उपक्रम सहभागासाठी प्रोत्साहित करावे.
- जागतिक शौचालय दिनाच्या निमित्ताने उपक्रमांचे आयोजन करताना कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाबाबत आरोग्य विभागाने दिलेल्या सर्व सूचनांचे काटेकोर पालन करावे.

**ब) उपक्रमांचा तपशील:-**

संदर्भ क्रमांक २ येथील शासन परिपत्रकान्वये **स्वच्छ भारत अभियान (ग्रामीण) टप्पा २ अंतर्गत** सामुदायिक/सार्वजनिक शौचालयासंदर्भात मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. सदर सूचनांमध्ये नमूद अनिवार्य बाबींची पूर्तता होण्याच्या अनुषंगाने तसेच शाळा, अंगणवाडी, ग्रामपंचायत कार्यालयातील शौचालये आणि वैयक्तिक शौचालयांबाबत पुढीलप्रमाणे कार्यवाही करण्यात यावी:-

**१. सार्वजनिक शौचालयांमध्ये पाण्याची सुविधा उपलब्ध करणे :** सार्वजनिक शौचालयाचा शाश्वत वापर आणि स्वच्छतेसाठी पाण्याची निरंतर उपलब्धता असणे अत्यंत महत्त्वाचे आहे. ज्या सार्वजनिक शौचालयांना पाणी उपलब्ध नाही अशा सर्व सार्वजनिक शौचालयांना ज्या गावात नळ योजना कार्यरत

आहे तिथे स्वतंत्र नळाद्वारे आणि जिथे नळ योजना कार्यरत नाही तिथे अन्य मार्गाने पाण्याची सुविधा उपलब्ध करून द्यावी . त्या अनुषंगाने शौचालयाचे वापरकर्ते आणि ग्रामपंचायत यात समन्वय ठेवावा . किती सार्वजनिक शौचालयांच्या ठिकाणी पाण्याची सुविधा असणे आवश्यक आहे अशा सार्वजनिक शौचालयांची यादी जिल्हा स्तरावर उपलब्ध ठेवावी.

२. **सार्वजनिक शौचालयांना वीज जोडणी उपलब्ध करून देणे:** सार्वजनिक शौचालयाचा शाश्वत आणि सुरक्षित वापर होण्यासाठी तसेच रात्रीच्या वेळी शौचालय वापरणे शक्य होण्यासाठी त्या ठिकाणी प्रकाश व्यवस्था उपलब्ध असणे अत्यंत महत्वाचे आहे. ज्या सार्वजनिक शौचालय परिसरात प्रकाश व्यवस्था उपलब्ध नाही अशा सर्व सार्वजनिक शौचालयांना वीज जोडणी उपलब्ध करून देण्यात यावी. जिल्हा पाणी व स्वच्छता कक्षाने या संदर्भात ग्रामपंचायत निहाय माहिती संकलित करून स्थानिक ग्रामपंचायतीच्या मदतीने या उपक्रमांतर्गत जास्तीत जास्त सार्वजनिक शौचालयांना वीज जोडणी उपलब्ध होण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी.

३. **सार्वजनिक शौचालय परिसर स्वच्छता**: सार्वजनिक शौचालयाचा शाश्वत, सुरक्षित आणि आरोग्यदायी वापर होण्यासाठी सार्वजनिक शौचालयांचा परिसर स्वच्छ असणे महत्वाचे आहे. ग्रामपंचायत आणि स्थानिक लोकसहभागातून ज्या सार्वजनिक शौचालयांच्या परिसरात झाडे झुडपे वाढली आहेत, गवत वाढलेले आहे, सांडपाणी/काळे पाणी (Black Water) साचलेले आहे अशा अस्वच्छ परिसराची या उपक्रमांतर्गत साफसफाई आणि स्वच्छता करावी.

४. **कुटुंबस्तर शौचालय परिसर स्वच्छता आणि सुशोभीकरण**: ग्रामपंचायत आणि स्वच्छाग्रहीच्या माध्यमातून सार्वजनिक आवाहन करून शौचालय असणाऱ्या सर्व कुटुंबांना आपापल्या शौचालयाचा परिसर स्वच्छ करण्यासाठी आणि सुशोभित करण्यासाठी प्रोत्साहित करावे.

विशेषत: कोरोना विषाणूच्या प्रादुर्भावाच्या पार्श्वभूमीवर, शौचालयाचे महत्व अधोरेखित करणारा संवाद साधावा. या दरम्यान स्थानिक लोकप्रतिनिधी, अधिकारी, स्वच्छाग्रही आणि सामाजिक कार्यकर्त्यांनी शौचालय परीसर स्वच्छ करणाऱ्या कुटुंबाना भेट देऊन सहभागी कुटुंबांचा उत्साह वाढवावा.

५. **नादुरुस्त सार्वजनिक शौचालयांची दुरुस्ती:** नादुरुस्त सार्वजनिक शौचालये स्थानिक ग्रामपंचायत आणि लोकसहभागच्या माध्यमातून वापरायोग्य करण्यात यावीत. सार्वजनिक शौचालयांची दुरुस्ती करून आवश्यक त्या सर्व सोयीसुविधांसह वापरासाठी उपलब्ध करुन द्यावीत.

६.**ग्रामपंचायत कार्यालयातील नादुरुस्त शौचालयांची दुरुस्ती**: ग्रामपंचायतीमधील शौचालये स्वच्छ आणि दुर्गंधीमुक्त असणे आवश्यक आहेत. या उपक्रमांतर्गत ग्रामपंचायतीने अशा शौचालयांची दुरुस्ती करून ती वापरासाठी उपलब्ध करून द्यावीत.

७.**शाळा/अंगणवाडी नादुरुस्त शौचालयांची दुरुस्ती:** ज्या ग्रामपंचायत क्षेत्रात शाळा आणि अंगणवाडी शौचालये नादुरुस्त आहेत त्यांची या उपक्रमांतर्गत स्थानिक ग्रामपंचायतीच्या सहकार्याने दुरुस्ती करुन आवश्यक त्या सर्व सोयीसुविधांसह वापरासाठी उपलब्ध करुन द्यावीत.

८.**वैयक्तिक शौचालयाचे बांधकाम व प्रोत्साहन अनुदान वाटप** :-यापूर्वी तसेच सद्यस्थितीत पायाभूत सर्वेक्षणातून सुटलेल्या (LOB) आणि पायाभूत सर्वेक्षणाबाहेरील (NOLB) अंतर्गत वैयक्तिक शौचालय बांधकाम

पूर्ण केलेल्या ज्या लाभार्थी कुटुंबाला प्रोत्साहन अनुदान देण्यात आलेले नाही अशा सर्व लाभार्थी कुटुंबांना वरील विशेष अभियान कालावधीत शौचालयाचे प्रोत्साहन अनुदान वाटप करावे. सदर अनुदान वाटपाची माहिती केंद्र शासनाच्या SBMMIS वर नोंदवावी.

उपरोक्तनुसार जागतिक शौचालय दिन अभियान कालावधीत केलेल्या सर्व उपक्रमांची प्रत्येकी पाच छायाचित्रे विवरणपत्र १ व २ नुसार अहवालासह (रंगीत) directorwsso@gmail.com, dsnpd.wsnsd @maharashtra.gov.in आणि smita.rane@nic.in या ई-मेल आयडीवर दिनांक १ डिसेंबर २०२० पर्यन्त सादर करण्यात यावा.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा सांकेतांक क्रमांक २०२०१११११७५१३८५०२८ असा आहे. हे शासन परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chandrakant Krishna More

Digitally signed by Chandrakant Krishna More
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=11ac200219edb36f7777ee1101657bea4271090267228122b638d6f2cdedad62, serialNumber=2314cf333e070f9936792bc95890fa89b2f617a931b2b577b703fa858f3df433, cn=Chandrakant Krishna More
Date: 2020.11.11 17:54:45 +05'30'

**(चं. कृ. मोरे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव.
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
३. सर्व मा.मंत्री/ मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
४. विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
५. मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव सर्व,मंत्रालय, मुंबई.
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
८. जिल्हा परिषद अध्यक्षा/अध्यक्ष ,सर्व.
९. सर्व विभागीय आयुक्त व जिल्हाधिकारी
१०. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
११. सहसचिव,पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. प्रकल्प संचालक (स्वभामि), राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर, नवी मुंबई.
१३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद सर्व.
१४. उपायुक्त (विकास), सर्व.

१५. उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( पाणी व स्वच्छता/पंचायत), जिल्हा परिषद सर्व, यांनी ह्या शासन निर्णयाच्या छायाप्रती प्रत्येक पंचायत समिती सभापती /उपसभापती व गट विकास अधिकारी यांना द्याव्यात व गट विकास अधिकारी यांनी प्रत्येक पंचायत समिती सदस्य, सरपंच व ग्राम विकास अधिकारी यांना द्याव्यात.

१६. उप अभियंता, ग्रामिण पाणीपुरवठा उप विभाग सर्व

१७. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.

१८. संगणक समन्वयक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, यांनी सदरचे शासन परिपत्रक, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, राज्य पाणी व स्वच्छता मिशन, बेलापूर व राज्य शासनाच्या संकेतस्थळावर अपलोड करावा तसेच वरील सर्वांना ई-मेल द्वारेही पाठवावा.

१९. निवडनस्ती,पापु-१६.

## विवरणपत्र १

जागतिक शौचालय दिन २०२०

----------------------- जिल्हा उपक्रम अहवाल

१. उपक्रम अहवाल सादर करताना खालील माहिती समाविष्ट असावी -

| क्र. | तपशील | विवरण |
|---|---|---|
| ०१ | प्रस्तावना | प्रस्तावना द्यावी. उद्देश, स्वरूप यासंबंधी माहिती द्यावी |
| ०२ | पूर्वतयारी | जागतिक शौचालय दिन उपक्रम आयोजनाच्या संदर्भात केलेल्या पूर्वतयारी संबंधी माहिती द्यावी |
| ०३ | नियोजन प्रक्रिया | जागतिक शौचालय दिन उपक्रम आयोजनाच्या संदर्भात जिल्ह्यातील नियोजन कसे केले यासंबंधी माहिती द्यावी |
| ०४ | संपर्क पद्धती | जागतिक शौचालय दिन संबंधी विविध विभाग, संस्था, ग्रामपंचायती यांच्याशी संपर्क साधल्या गेला असेल त्या संपर्काची पद्धती द्यावी |
| ०५ | उपक्रम अंमलबजावणी | जागतिक शौचालय दिन निमित्त्य कुठले कुठले उपक्रम राबविले याची यादी द्यावी |
| ०७ | सहभागी ग्रामपंचायत संख्या | जागतिक शौचालय दिन २०२० मध्ये विविध उपक्रमांच्या माध्यमातून सहभागी झालेल्या ग्रामपंचायतीची एकूण संख्या द्यावी |
| ०८ | सहभागी इतर संस्थाची नावे | जागतिक शौचालय दिन २०२० मध्ये विविध उपक्रमांच्या माध्यमातून सहभागी झालेल्या विविध संस्थांची नावे द्यावीत |
| ०९ | उपक्रमाच्या माध्यमातून लाभ मिळणाऱ्या व्यक्तींची एकूण संख्या | जागतिक शौचालय दिन २०२० दरम्यान आयोजित उपक्रमांच्या माध्यमातून ज्यांना प्रत्यक्ष लाभ मिळणार आहे अशा व्यक्तींची, विद्यार्थ्यांची जिल्ह्यातील एकूण संख्या |
| १० | प्रसिद्धी | जागतिक शौचालय दिन २०२० संबंधी जिल्हा उपक्रमांना वृत्तपत्रातून मिळालेल्या प्रसिद्धीची कात्रणे |
| ११ | छायाचित्रे | उपक्रमांची निवडक छायाचित्रे |

- या व्यतिरिक्त काही ठळक बाबींचा उल्लेख अहवालात करता येईल.
- उपक्रम संबंधी चित्रफित तयार केल्यास त्याची लिंक अहवालासोबत द्यावी.

## विवरणपत्र २

| जिल्हा | दुरुस्त केलेली शौचालये | | | | बांधकाम पूर्ण केलेली शौचालय | | अनुदान वितरित केलेली शौचालय | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | सार्वजनिक शौचालय | शाळा | अंगणवाडी | ग्राम पंचायत कार्यालय | सार्वजनिक शौचालय | वैयक्तिक शौचालय | सार्वजनिक शौचालय | वैयक्तिक शौचालय |
| | | | | | | | | |

स्वाक्षरी

उप मुख्य कार्यकारी अधिकारी (पा व स्व)
जिल्हा परिषद --------

## विवरणपत्र ३

**उपक्रमांचे नियोजन**

| अ क्र | तपशील | दिनांक |
|---|---|---|
| १ | अभियानाच्या पूर्व तयारीसाठी राज्य स्तरावर जिल्हयांसाठी VC चे आयोजन करणे | १२-११-२०२० |
| २ | अभियानाच्या पूर्व तयारीसाठी जिल्हयाकडून सर्व ग्राम पंचायतीं सोबत VC चे आयोजन करणे | १३-११-२०२० |
| ३ | सार्वजनिक शौचालय/शालेय शौचालय/अंगणवाडी शौचालय/ग्राम पंचायत कार्यालय शौचालय यांची स्वच्छता | १४-११-२०२० ते १६-११-२०२० |
| ४ | सार्वजनिक शौचालय/शालेय शौचालय/अंगणवाडी शौचालय/ग्राम पंचायत कार्यालय शौचालय नादुरुस्त असल्यास त्यांची दुरूस्ती करणे | १४-११-२०२० ते २०-११-२०२० |
| ५ | कुटुंबस्तर शौचालय परिसर स्वच्छता आणि सुशोभीकरण | १९-११-२०२० |
| ६ | सार्वजनिक शौचालयांमध्ये पाण्याची सुविधा उपलब्ध करणे | १४-११-२०२० ते १९-११-२०२० |
| ७ | शौचालय पूर्ण केलेल्या लाभार्थी कुटुंबांना प्रोत्साहन अनुदान वितरण | १९-११-२०२० पर्यन्त |
| ८ | सार्वजनिक शौचालयांना वीज जोडणी उपलब्ध करून देणे | १४-११-२०२० ते १९-११-२०२० |
| ९ | वैयक्तिक शौचालयाचे बांधकाम व प्रोत्साहन अनुदान वाटप | २७-११-२०२० पर्यन्त |
| १० | अभियान उपक्रमाचा अहवाल राज्य स्तरावर सादर करणे | १-१२-२०२० |